**तूर उत्पादक शेतकऱ्यांना सहाय्य करण्यासाठी राज्यशासन स्तरावर बाजार हस्तक्षेप योजना राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सपस-२०१७/प्र.क्र. ७७ /२४ स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
दिनांक:- २७ एप्रिल, २०१७

**प्रस्तावना:-**

राज्यात हंगाम २०१६-१७ मध्ये मान्सूनचा समाधानकारक पाऊस व अनुकूल हवामान यामुळे तूरीचे मुबलक प्रमाणात उत्पादन झालेले आहे. केंद्रशासनाने हंगाम २०१६-१७ करिता तूरीसाठी रु. ५०५०/- प्रति क्विंटल (रु. ४६२५/- + रु. ४२५ बोनससह) इतकी किमान आधारभूत किंमत जाहीर केलेली आहे. कृषी विभागाच्या तिसऱ्या अंदाजानुसार (Third Advance Estimate) राज्यात तूरीचे उत्पादन मोठ्या प्रमाणात अपेक्षित आहे. बाजारात तूरीची मोठ्या प्रमाणात आवक होऊन तूरीला प्रति क्विंटल रु. ४००० ते ४५०० च्या दरम्यान म्हणजेच हमीभावापेक्षा कमी भाव मिळत आहे.

शेतकऱ्यांना त्यांच्या शेतमालासाठी योग्य भाव मिळावा यासाठी राज्यशासनाने केंद्रशासनाच्या मदतीने विविध उपाययोजना केल्या आहेत, उदा. केंद्रशासनाच्या किंमत स्थिरता निधी अंतर्गत किमान आधारभूत दराने खरेदी करणे, तूरीच्या आयातीवर १०% आयात शुल्क लावणे व साठा मर्यादा १०५०० क्विंटलपर्यत वाढविणे, इ. तथापि, तूरीच्या बाजारभावात फारसा फरक पडलेला नाही.

राज्यातील तूरीचे विपुल उत्पादनामुळे शेतकऱ्याला मिळणारा कमी बाजारभाव विचारात घेता, राज्यशासनाने तूरीसाठी बाजार हस्तक्षेप योजना राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

राज्यातील तूर उत्पादक शेतक-यांना सहाय्य करण्यासाठी राज्य शासनाकडून तूरीसाठी बाजार हस्तक्षेप योजना राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे. या योजनेंतर्गत दिनांक २२/४/२०१७ पर्यंत खरेदी केंद्रावर आवक होऊन, नोंद झालेली तूर खरेदीविना शिल्लक आहे, अशी तूर जवळपास १० लाख क्विंटल आहे, त्या शिल्लक तूरीची खरेदी खालील सूचनांप्रमाणे करण्यात येईल:-

१. शासनाच्यावतीने बाजार हस्तक्षेप योजने अंतर्गत तूर खरेदी करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई व दि विदर्भ सहकारी पणन महासंघ मर्या., नागपूर या संस्थांची “नोडल एजन्सी” म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. या संस्थांनी तूर खरेदी योजनेची जबाबदारी घेवून त्याचे व्यवस्थापन करावयाचे आहे.

२. सदर योजने अंतर्गत केंद्रशासनाने हंगाम २०१६-१७ करिता प्रमाणित केलेल्या मापदंडानुसार **फक्त (FAQ) एफएक्यू दर्जाच्या** तूरीची खरेदी रु. ५०५०/- प्रति क्विंटल ( रु.४६२५/- + रु. ४२५/- बोनससह) प्रमाणे करण्यात येईल.
३. खरेदी केंद्रावरील खरेदीविना शिल्लक असलेल्या तूरीचा पंचनामा करण्यासाठी संबंधित तालुक्याचे तहसिलदार यांच्या अध्यक्षतेखाली सहायक निबंधक, सहकारी संस्था, सचिव कृषि उत्पन्न बाजार समिती, व्यवस्थापक, सबएजंट संस्था तसेच पणन महासंघ/विदर्भ पणन महासंघ यांचा प्रतिनिधी याचा समावेश असलेली समिती संबंधित जिल्हाधिकारी यांचेमार्फत त्वरित गठीत करण्यात येईल.
४. कृषि उत्पन्न बाजार समितीच्या आवारात खरेदी केंद्रावर दिनांक २२/४/२०१७ रोजी प्रत्यक्ष आलेल्या तूरीची नोंद असलेली नोंदवही गठीत केलेल्या समितीने अंतिम करुन जिल्हा उपनिबंधकामार्फत जिल्हाधिकाऱ्यांना सादर केल्यानंतर, संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी मान्यता दिल्यानंतर त्या केंद्रावरील तूरीची खरेदी सुरु करण्यात येईल.
५. या योजने अंतर्गत कृषि उत्पन्न बाजार समितीमध्ये दिनांक २२/०४/२०१७ अखेर पर्यंत आवक झालेल्या व नोंदवहीत नोंद असलेल्या/टोकन दिलेल्या तूरीची शासनाकडे प्राप्त झालेल्या माहितीनुसार १० लाख क्विंटलपर्यंत खरेदी करण्यात येईल. याबाबत समन्वयाची जबाबदारी पणन संचालक, पुणे यांची राहील.
६. सदर खरेदी करतांना शेतक-यांचा ७/१२ उतारा, त्यावरील पीक पेरा/पाहणी प्रमाणे तूरीची नोंद आहे याची खात्री करुन, पीक पेऱ्यानुसार व कृषी विभागाने निश्चित केलेल्या हेक्टरी उत्पादनानुसार शेतकऱ्याकडून खरेदी करण्यात येईल. तत्पूर्वी शेतकऱ्यांकडून यापूर्वी शासनास कुठे कुठे आणि किती क्विंटल तूरीची विक्री केली आहे, याबाबत Self-Declaration घेण्यात यावे आणि त्यानंतर त्याने आणलेली तूर त्याच्या शेतातील उत्पादन असल्याची खात्री झाल्यानंतरच त्याच्याकडून तूर खरेदी करावी.
७. तूरीचा नमुना घेण्याची जबाबदारी पणन संचालक,पुणे अथवा त्यांचे क्षेत्रीय स्तरावरील प्रतिनिधी यांची राहील.
८. खरेदी केंद्राशी जोडलेले/संलग्न गांवाव्यतिरिक्त इतर गावांतील तूर व परराज्यातून आवक झालेल्या आणि व्यापाऱ्यांच्या तूरीसाठी ही योजना लागू राहणार नाही.
९. या योजने अंतर्गत खरेदी केलेल्या तूरीच्या चुकाऱ्याची रक्कम ज्या शेतकऱ्यांच्या नांवे ७/१२ चा उतारा आहे, त्यांच्या आधारकार्डशी संलग्न असलेल्या बँक खात्यावर ऑनलाईन पध्दतीने एनईएफटी/आरटीजीएसद्वारे वर्ग करण्यात येईल.
१०.या योजने अंतर्गत खरेदी केलेली तूर सहकार, वस्त्रोद्योग व पणन विभागाच्या नांवे महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ व केंद्रीय वखार महामंडळाच्या गोदामात ठेवावयाची असल्याने रक्कम

रु.५५५५/- प्रति क्विंटल ( किमान आधारभूत किंमत रु. ५०५०/- व अनुषंगिक खर्च रु. ५०५/- सह ) याप्रमाणे नोंद घेवून वेअर हाऊस रिसीट (गोदाम पावती) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ व केंद्रीय वखार महामंडळ यांनी नोडल संस्थांना त्याच दिवशी अथवा दुसऱ्या दिवशी १२ वाजेपर्यंत उपलब्ध करुन द्यावी.

११.या योजनेसाठी शासनाच्या नोडल संस्थांना नाफेड व एफसीआयने प्रमाणित केल्याप्रमाणे अनुषंगीक खर्च देण्यात येईल.

१२.सदर योजना राबवितांना पारदर्शकता असणे आवश्यक असल्याने तूरीच्या खरेदीबाबतची सर्व कागदपत्रे व नोंदी व्यवस्थितरित्या नोडल संस्थांच्या दप्तरी ठेवण्यात याव्यात.

१३.पणन संचालक, पुणे यांनी किंमत स्थिरता निधी योजनेंतर्गत खरेदी केलेल्या तूरीची माहिती पणन महासंघ व विदर्भ पणन महासंघ यांच्याकडून उपलब्ध करुन घ्यावी. त्याआधारे सर्वात जास्त तूर विक्री केलेल्या प्रथम १००० शेतकऱ्यांची यादी तयार करुन, त्या शेतकऱ्यांची एका आठवड्यात चौकशी करावी. सदर चौकशीत दोषी आढळून आलेल्या शेतकऱ्यांवर योग्य ती कारवाई करुन त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

१४.या योजनेंतर्गत तूर खरेदीसाठी पणन महासंघाने/विदर्भ पणन महासंघाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या बारदानाचा सर्वप्रथम वापर करावा व आवश्यकता भासल्यास बारदाना ई-निविदेद्वारे पणन महासंघाने/विदर्भ पणन महासंघाने उपलब्ध करुन घ्यावा.

तूर खरेदी करण्यापूर्वी नोडल संस्थांनी बारदान्यावरती निळ्या रंगाचे मार्किंग करावे. त्यामध्ये “महाराष्ट्र शासन, पणन विभाग, २०१६-२०१७ तूर” असे नमूद करावे.

१५. या योजने अंतर्गत खरेदी केली जाणारी तूर महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ व केंद्रीय वखार महामंडळाच्या खरेदी केंद्राजवळील गोदामामध्ये साठविण्यात यावी. यासाठी खरेदी केंद्रापासून गोदामाची मर्यादा जास्तीत जास्त २०० किलो मिटरपर्यंत राहील.

१६.गोदामामध्ये साठवणूक केलेल्या तूरीची गुणवत्ता राखण्याची तसेच देखरेख करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाची राहील.

१७. यासाठी लागणारा निधी नोडल संस्थांना शासनाच्या वित्त विभागामार्फत अथवा शासनहमी-द्वारे उपलब्ध करावयाचा आहे. याबाबतचा प्रस्ताव स्वतंत्ररित्या सादर करण्यात येईल.

१८. खरेदी केलेल्या तुरीच्या विक्रीसाठी पणन महासंघ/विदर्भ पणन महासंघाने स्वतंत्र प्रस्ताव सादर केल्यानंतर त्याबाबत स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येईल.

१९. ही योजना किफायतशीर होण्यासाठी व यशस्वीपणे राबविण्यासाठी पणन महासंघ/विदर्भ पणन महासंघाने कार्यक्षमरित्या प्रयत्न करणे आवश्यक आहे. यासाठी त्यांनी यापूर्वी नाफेडमार्फत राबविण्यात आलेल्या योजनांचा अनुभवाचा फायदा/मदत घ्यावी.

२०. नोडल संस्थांनी दैनंदिन खरेदी अहवाल उपसचिव (पणन) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना दुस-या दिवशी सकाळी ११.३० वाजेपर्यंत सादर करावा.

२१. कृषि उत्पन्न बाजार समितीस्तरावर स्थापन करण्यात आलेल्या संनियंत्रण समितीमार्फत खरेदी केंद्रावरील व्यवहारावर देखरेख करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२७१०२८१४४४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Sunanda M Ghadyale

Digitally signed by Sunanda M Ghadyale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9edecaf650dad6e8311b45, serialNumber=c5adff2513f33afa9ed70c79c5a4636204d8bb4040bf2c6c2470d0f20d8dc79d, cn=Sunanda M Ghadyale
Date: 2017.04.27 10:55:28 +05'30'

**( सुनंदा मो. घड्याळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रति,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सर्व जिल्हाधिकारी
३) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
५) सर्व तहसिलदार
६) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
७) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
८) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
९) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
१०) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
११) मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
१२) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई
१४) व्यवस्थापकीय संचालक, दि विदर्भ सहकारी पणन महासंघ मर्या. नागपूर
१५) अध्यक्ष, कृषी उत्पन्न बाजार समिती(सर्व)

१६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१८) जिल्हा कोषागार अधिकारी,  पुणे,
१९) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
२०) कार्यासन अधिकारी, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१) निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.